*केंद्र पुरस्कृत अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम*
*व एकात्मिक पडिक जमीन विकास कार्यकमांतर्गत*
*सन २००९-१० या वर्षातील आर्थिक*
*तरतूदीतून राज्य प्रभागाचे वितरण*
*(मुख्य लेखा शिर्ष २५०१ ०३१५)*

महाराष्ट्र शासन
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : निधीवि ४४०९/प्र.क्र.२१(२)/ जल-२०.
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १७ जून,२००९.

**वाचा :**

1. शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग,क्रमांक बीयुडी २००९/प्र.क्र.१८/कार्यासन ७,दिनांक १८मार्च, २००९.
2. शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग,क्रमांक बीयुडी २००९/प्र.क्र.१९/कार्यासन ७,दिनांक ५ मे,२००९.
3. शासन परिपत्रक ग्रामविकास व जलसंधारण विभाग,क्रमांक निधीवि४४०८/प्र.क्र५५/जल२०.२७ फेब्रुवारी, २००९

भुमी संसाधन विभाग, केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय, यांचे आदेश क्र -

4. S.११०२१/२६/२००८-DPAP, गडचिरोली, दिनांक २० एप्रिल,२००९
5. S.११०२१/२४/२००८-DPAP, अमरावती दिनांक २२ मे,२००९
6. S.११०२१/६/२००८-DPAP, चंद्रपुर, दिनांक १ जून,२००९

प्रस्तावना :

अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम हा केंद्र पुरस्कृत कार्यक्रम असून त्याकरीता केंद्र शासन व राज्य शासन यांचा हिस्सा अनुक्रमे ७५:२५ असा आहे. सन १९९९ चे मार्गदर्शक तत्वाखालील १४०३ पाणलोटांमध्ये कामे सूरू असून याकरीता सात हप्त्यांमध्ये निधी प्राप्त होतो तर २००३ चे मार्गदर्शक तत्वाखालील १३९५ पाणलोटांकरीता पाच हप्त्यांमध्ये निधी प्राप्त होतो.

२. सन २००८-०९ या आर्थिक वर्षामध्ये केंद्र शासनास केंद्र हिस्सा मिळण्याबाबत सादर केलेल्या प्रस्तावापैकी केंद्र शासनाने संदर्भाधीन ३ येथील आदेशान्वये गडचिरोली या जिल्ह्यांना केंद्र हिस्सा वितरीत केला आहे. त्यानुसार आदिवासी उपयोजनेअतर्गत राज्यहिस्सा खालीलप्रमाणे आहे.

| कार्यक्रम | जिल्हा | बॅच | प्राप्त केंद्र हप्ता | एकूण पाणलोट | पाणलोट (आउयो मधील) | केंद्र हिस्सा | एकूण राज्य हिस्सा | आउयो राज्य हिस्सा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| अप्रक्षे १९९९ | गडचिरोली | ६ | ७ | ४० | ४० | १३२.३३ | ४५ | ४५ |
| हरियाली २००३ | चंद्रपूर | ३ | २ | ७ | ७ | ४७.०६ | १५.७५ | १५.७५ |
| हरियाली २००३ | अमरावती | ४ | २ | ३० | २ | २०२.२६ | ६७.४२ | ४.५ |

३ सन २००६-०७ या आर्थिक वर्षामध्ये दिलेल्या आगावू राज्य हिश्शाचे समायोजनाबाबतची सद्यस्थिती सोबतचे विवरणपत्रातील रकाना क्र ९ मध्ये नमूद केली असून या आदेशान्वये जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेस उपलब्ध करून द्यावयाच्या तरतुदीचा तपशीलही

रकाना क्र १२ नुसार दिला आहे व त्याप्रमाणे मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी संबंधित जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेचे प्रकल्प संचालकांना निधी उपलब्ध करून द्यावयाचा आहे

**शासन निर्णय**:-

४ संदर्भाधीन १ येथील आदिवासी विकास विभागाच्या शासन निर्णयान्वये आदिवासी उपयोजनेकरीताची सन २००९-१० या आर्थिक वर्षाचा नियतव्यय रु. १०.५७४४ कोटी मंजूर केला असून दिनांक २१ मे २००९ चे शासन निर्णयान्वये रू ६.२००७ कोटीाची अर्थसंकल्पित तरतूद प्रशासकीय विभाग म्हणून या विभागास उपलब्ध करुन दिलेली आहे. जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांना ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.बीयुडी-१०८३/ सीआर-७७/५०, दि. २६ मार्च, १९८२ व क्र.आयआरडी-११८९/सीआर ३६४/ ४२, दि.१६ जून, १९८२ अनुसार अवर्षण प्रवण क्षेत्र कार्यक्रमांतर्गत विहित लेखाशिर्षाखाली नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले आहे. यास अनुलक्षून

अ) केंद्र शासनाने संदर्भाधीन ६ येथील आदेशान्वये अमरावती जिल्ह्यासाठी वितरीत केलेल्या निधीस अनुषंगुन वितरीत करावयाच्या राज्यहिश्शापैकी आदिवासी बहूल तालूक्यात येत असलेल्या २ पाणलोटांकरीता मंजूर करण्यात आलेला रु.**४.५ लक्ष (रुपये चार लक्ष पन्नास हजार फक्त)** निधी कोषागारातून काढून तेवढाच निधी मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा जिल्हा अमरावती यांनी प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, अमरावती यांना रकाना १२ मध्ये नमुद केल्यानुसार उपलब्ध करुन द्यावा.

ब) केंद्र शासनाने संदर्भाधीन ४ येथील आदेशान्वये गडचिरोली जिल्ह्यासाठी वितरीत केलेल्या केंद्रीय हिश्शाचे अनुषंगाने राज्य हिस्सा आदिवासी बहूल तालूक्यात येत असलेल्या ४० पाणलोटांकरीता रू ४५ लक्ष देय आहे. त्यानुसार देय असलेल्या रु. ४५ लक्ष **(रुपये पंचेचाळीस लक्ष फक्त)** निधी कोषागारातून काढून तेवढाच निधी मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद तथा अध्यक्ष जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, जिल्हा गडचिरोली यांनी प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, गडचिरोली यांना रकाना १२ मध्ये नमुद केल्यानुसार उपलब्ध करुन द्यावा.

क)केंद्र शासनाने संदर्भाधीन ६ येथील आदेशान्वये चंद्रपुर जिल्ह्यासाठी वितरीत केलेल्या केंद्रीय हिश्शाचे अनुषंगाने राज्य हिस्सा आदिवासी बहूल तालूक्यात येत असलेल्या ७ पाणलोटांकरीता रू १५.७५ लक्ष देय आहे. तथापी या कार्यक्रमामध्ये सन २००७ मध्ये केंद्र शासनाला सादर केलेल्या हप्त्याचे प्रस्तावास अनुलक्षून दिलेल्या आगावू राज्य हिश्शा रू ३३.४५ लक्षपैकी समायोजित न झालेला रू १६.५३ लक्षपैकी रू १५.७५ लक्ष याआदेशाव्दारे समायोजित केले असून चंद्रपूर जिल्हयास राज्य हिस्सा मिळणार नाही

४ परिच्छेद ३ लक्षात घेता आदिवासी घटकाकरीताचा **रु. ४९.५ लक्ष (रुपये एकोणपन्नास लक्ष पन्नास हजार** फक्त) खर्च मुख्य लेखाशिर्ष,आदिवासी घटकाकरीता आदिवासी विकास विभागाचे मागणी क्र टि-५ "२५०१, विशेष ग्राम विकास कार्यक्रम -पंचवार्षिक योजनांतर्गत योजना -०२- अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम - ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना (०१) जनजाती उपयोजनांतर्गत योजना राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०१) अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम (२५०१०३१५) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशीर्षाखाली सन २००९-२०१० मध्ये मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. मुक्त केलेली रक्कम कॅशफ्लोमध्ये तसेच चार महिनयाचे लेखानुदानामध्ये समाविष्ट आहे. संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी आदिवासी उपयोजनेचा निधी उपलब्ध करुन दिल्यावर संबंधित प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, यांनी निधी वितरित करतांना वर नमूद केंद्र शासनाच्या पत्रातील अटींचे तसेच केंद्राच्या मार्गदर्शक सूचनांच्या अधिन राहून निधी वितरण/खर्च करण्यात यावा

५ ही तरतूद सन १९९५ पासून सुरु असलेल्या पाणलोट विकास कार्यक्रमासाठी व त्यातील बांधील कामासाठी, वनीकरणाचे देखभालीची कामे तसेच जिल्हा परिषद/जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा व राज्यस्तरावरील नेमलेल्या कर्मचाऱ्यांच्या वेतनासाठी कोणत्याही परिस्थितीत खर्च करु नयेत. केंद्र शासन व महाराष्ट्र शासन यांनी वेळोवेळी घालून दिलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार तसेच वार्षिक योजनेच्या अधिन राहून या निधीचा उपयोग करण्यात यावा.

६ सर्वसधारण घटकांमधील पाणलोटांबाबतच्या निधी वितरणाबाबतच्या सूचना जिल्हाधिकारी यांस स्वतंत्रपणे व प्रकरणपरत्वे देण्यात येत आहेत. त्यानुसार कोणत्याही प्रकारचे आगाउ हिश्शाचे समायोजन नाही व केंद्र शासनाचे केंद्र हिश्शाचे आदेश प्रकल्प

संचालकांनी सादर केल्यावरच राज्य हिस्सा देण्याची कार्यवाही या विभागाचे संबंधित पाणलोटांबाबतचे आदेशानुसारच जिल्हाधिकारी कार्यालयाने करावी.

७ प्रकल्प संचालक जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, गडचिरोली व अमरावती यांनी पुढील मुद्यांबाबतची माहिती या विभागाला पाठवावी.

१) या शासन निर्णयाद्वारे मंजूर केलेले अनुदान,
२) कोषागारातून काढलेली रक्कम,
३) रक्कम काढल्याचा दिनांक व प्रमाणक क्रमांक.

८ हे आदेश निर्गमित झाल्यावर रू ६२०.०७ लक्षपैकी रू २७.५५ लक्ष वितरीत होवून रू ५९२.५२ लक्ष तरतूद उपलब्ध आहे.

९ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२००९०६१७१९३०३५००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,

**(मि. का. फडके)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
1. विभागीय आयुक्त,नागपूर/अमरावती विभाग
2. जिल्हाधिकारी, गडचिरोली,चद्रपुर व अमरावती
3. जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,गडचिरोली,चद्रपुर व अमरावती
4. संचालक, सामाजिक वनीकरण विभाग, पुणे
5. संचालक, मृदसंधारण व पाणलोट व्यवस्थापन पुणे
6. सहसंचालक सामाजिक वनीकरण, नागपूर/अमरावती विभाग
7. विभागीय कृषि सहसंचालक नागपूर/अमरावती विभाग
8. उपायुक्त (विकास),नागपूर/अमरावती विभाग
9. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,गडचिरोली,,चद्रपुर व अमरावती
10. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखापरिक्षा) (लेखा अनुज्ञेयता) (५ जादा प्रतींसह)
11. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखापरिक्षा) (लेखाअनुज्ञेयता) (५ जादा प्रतींसह)
12. जिल्हा कोषागार अधिकारी,गडचिरोली ,चद्रपुर व अमरावती
13. अप्पर संचालक/उपसंचालक,प्रकल्पआखणी व एकात्मिक ग्रामीणविकास कार्यक्रम कक्ष, कुटीर क्र१४, अधिदान व लेखाअधिकारी कार्यालयाच्या बाजूला, मुंबई-२१.
14. सर्व उपसचिव (जलसंधारण प्रभाग) ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
15. वरीष्ठ लेखा अधिकारी, जल-११/१९/ ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
16. उप सचिव,अर्थसंकल्प(कार्यासनवित्त-१),ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
17. निवडनस्ती/जल-२०, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई

**शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभाग क्र निधिवि ४००९ /प्रक्र( २१ )(२)/जल-२० दिनांक १७ जून २००९ चे आदिवासी उपयोजना अवर्षण प्रवण क्षेत्रविकास कार्यक्रम १९९९ व हरियाली २००३ मधील तरतूदीचे वितरण आदेशातील सहपत्र**

| अ.क्र | जिल्हे | आदिवासी विकास विभागाने २००९-१० करीता मंजूर केलेला नियतव्यय | आदिवासी विकास विभागाने चार महिन्यांकरीता अर्थसंकल्पीत केलेला नियतव्यय | कार्यक्रम | बॅच/ पाणलोट /प्राप्त हप्ता | केंद्र प्राप्त हिस्सा | देय राज्य हिस्सा रक्कम | २००७ मध्ये दिलेल्या आगावू राज्य हिश्शातील १ एप्रिल , २००९ अखेर शिल्लक रक्कम | या आदेशा व्दारे केलेले समायोजन | या समायोजना नंतर असल्यास शिल्लक रक्कम | या समायोजना नंतर मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेस करावयाचे वितरण | या आदेशां नंतर शिल्लक तरतूद (३-१०) |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** | **७** | **८** | **९** | **१०** | **११** | **१२** | **१३** |
| **१** | गडचिरोली | १२३.७५ | ७२.५६ | अप्रक्षे १९९९ | सहा/४० ह.क्र .३ | १३२.३३ | ४५ | ० | ० | ० | ४५ | २७.५६ |
| २ | चंद्रपूर | ७२.९३ | ४२.७७ | हरियाली २००३ | तीन/७/ ह.क्र.२ | ४७.०७ | १५.७५ | १६.५३* | १५.७५ | ०.७८ | .० | ४२.७७ |
| ३ | अमरावती | ५६.०० | ३२.८४ | हरियाली २००३ | चार/२/ ह.क्र.२ | १३.०० | ४.५० | ०.०० | ०.०० | ०.०० | ४.५० | ४.५० |
| | **एकूण -** | | | | | १९२.४ | | | | | ४९.५० | |

* ३१ मे, २००९ अखेर शिल्लक आगावू राज्य हिस्सा